# विद्यार्थ्यांचा व्याकरणमित्र.

(आवृत्ति दुसरी)

किंमत दीड आणा.

# प्रस्तावना.



मित्रास प्रस्तावना नको. परंतु, एवढेंच कळविणें आहे कीं, व्याकरणाविषयीं स्वतंत्रपणें विचार करण्यास आमच्या तरुण विद्यार्थ्यांस संवय लागावी, एवढाच ह्या लहानशा पुस्तकाचा हेतु आहे. ह्याशिवाय आणखीही पुष्कळ सूचना करावयाजोग्या आहेत. त्या सवडीप्रमाणें करूं.

ह्यांत **साहित्य** ह्या सदराखालीं मराठी भाषेसंबंधीं विशेष माहिती दिली आहे. ती शोधक विद्यार्थ्यांस फार आवडेल.

हें पुस्तक विद्यार्थ्यांच्या उपयोगीं पडावें, अशी इच्छा आहे. ती **परमेश्वर** सफळ करो.

# अनुक्रमणिका.







# विद्यार्थ्यांचा व्याकरणमित्र.

## व्याकरण शिकण्याचा हेतु.

आपल्या भाषेंतल्या शब्दांचे धर्म आणि त्यांचे परस्परसंबंध हे समजून, भाषणाच्या अर्थाचें ज्ञान चांगलें व्हावें, किंवा तें ज्ञान संपादण्यास साह्य व्हावें, हा व्याकरण शिकण्याचा मुख्य हेतु आहे.

**राजमंदिर** ह्याचा अर्थ राजाचें घर असा आहे; पण **संसार-समुद्र** ह्याचा अर्थ संसाराचा समुद्र, असा नव्हे, तर संसार हाच समुद्र, असा आहे.

त्याच्या **दोन** थोबाडींत मार.—ह्यांत **दोन** ह्याचा संबंध थोबाडीकडे नाहीं; तर, **चापट्या** हा शब्द त्याच्यापुढें गुप्त आहे, त्याच्याकडे आहे.

**गडबडां** धरणीवरि लोळते.—ह्यांत **गडबडां** ह्याचा संबंध धरणीकडे नाहीं, लोळते ह्याकडे आहे.

कुत्रा कोल्हा धरितो.—ह्यांत, धरणें ही क्रिया करणारा कुत्रा, आणि तो धरितो कोल्ह्याला, असा अर्थ आहे.

कुत्रा भुंकते.—हें बरोबर नाहीं; भुंकतो पाहिजे; असें कां?

इत्यादि अनेक गोष्टी व्याकरण शिकल्यानें चांगल्या समजतात; त्यांचीं कारणें सांगतां येतात; आणि परभाषा शिकण्यास फारच साह्य होतें. शिवाय, भाषेंतले चमत्कार समजून आनंद होतो, तो वेगळाच.

# व्याकरण करणें ह्मणजे काय.

## (१)

१. व्याकरण करणें ह्यांत दोन प्रकार आहेत.

१. शब्दाचे गुण सांगणें.

२. शब्दाचा संबंध सांगणें.

**मुलगा पोथी वाचितो.** ह्यांत,

**लगा**–सामा० ना०, पु०, प्रथ० ए० व०, हे मुलगा ह्या शब्दाचे ण झाले; आणि, तो **वाचितो** ह्या क्रियापदाचा कर्ता आहे, हा ाचा संबंध होय.

२. शब्दाचे गुण सांगणें किंवा संबंध सांगणें, हें शब्दाच्या स्वरू-ावरून करूं नये; अर्थावरून करावें. कां कीं शब्दांचीं स्वरूपें अगदीं एकसारखीं असून, त्यांचे अर्थ अगदीं वेगळे वेगळे असतात. तेणेंक-रून त्यांचें व्याकरण वेगळ्या वेगळ्या प्रकारीं होतें. पहा.

तूं **वर** जा.–येथें वर हें **स्थ० क्रि० वि० अ०.**

तिला **वर** मिळेना.–येथें वर हें **सा० ना०.**

लबाडा**वर** विश्वास.–येथें वर हें **श० यो० अ०.**

मुलगा श्लोक **ह्मणून** गेला.–येथें म्हणून हें **धा० सा० अ०.**

तो गेला **ह्मणून** मी आलों.–येथें म्हणून हें **का०बो०उ०अ०**

रामा **ह्मणून** एक मुलगा होता.–येथें म्हणून हें **उभ० अ०.**

त्याप्रमाणेंच संबंध दाखविण्यांतही अर्थावर धोरण ठेविलें पाहि

**गारुडी साप धरितो.**

ह्यांत गारुडी आणि साप ह्या दोन्ही प्रथमा आहेत; परंतु, गा हा कर्ता आहे, आणि साप हें कर्म आहे.

---

## (२)

## नाम.

३. नाम म्हणजे नांव.

मुलगा.–हें वस्तूचें नांव.

दारू पिणें.–हें क्रियेचें नांव; ह्याचा एक शब्द होतो, **मद्यपान.**

वाईट माणसाची संगति. = **कुजनसंगति.**

उपकार करणाऱ्यास अपकार करणारा. = **कृतघ्न.**

मान हें धन आहे असें वाटतें असा सुज्ञ. = **मानधनप्राज्ञ.**

ह्यावरून समासांच्या योगानें केवढें काम होतें, हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. व्याकरणांत समासाची व्याख्या कशीही लांबट आणि कठिण असो; परंतु, उपयोगावरून पाहिलें म्हणजे समास ह्याचा अर्थ संक्षेप असा दिसतो.

समास कोणता आहे, हें ठरविणें अर्थावर आहे. **स्त्रीधन** ह्याचा विग्रह, **स्त्रीचें धन** असा जर केला, तर, तो तत्पुरुष होईल; आणि **स्त्री हेंच कोणी धन**, असा केला, तर कर्मधारय होईल. अर्थ कळल्यानें समास ठरवितां येतो, तसा समास कळल्यानें अर्थ समजण्यास साह्य होतें.

कधीं कधीं वाक्याचें वाक्य एका वस्तूच्या नांवाप्रमाणें एका गोष्टीचें नांव असतें.

त्यानें एक **पद** म्हटलें. ह्यांत **पद**, हें नाम.

त्यानें **येऊं नको** म्हटलें, ह्यांत **येऊं नको** हें नामासारखेंच आहे; पण नाम नव्हे.

तुला वाटतें कीं, **ह्या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं**, ह्यांत, ह्या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं, हें नामासारखें आहे.

असें जरी आहे, तरी शब्द वेगळे वेगळे आहेत तोंपर्यंत त्यांचें व्याकरण वेगळें वेगळें करावें.

---

## ( ३ )

## लिंगें.

४. कितीएक नामांस अनेक लिंगें लागतात.

**मूल, पोर.**–पुल्लिंगी, स्त्रीलिंगी, नपुंसकलिंगी.

**जागा, बाग, वीणा.**–पुल्लिंगी, स्त्रीलिंगी.

**मुंगूस, डुकर.**–पुल्लिंगी, नपुंसकलिंगी.

**तपकीर, मांजर.**–स्त्रीलिंगी, नपुंसकलिंगी.

ह्यांत अमक्या नामास अमुकच लिंग लावावें, असा आग्रह धरणें योग्य नाहीं. रूढि असेल ती खरी.

**ईण** प्रत्यय लागून स्त्रीलिंगी नामें, होतात त्यांविषयीं.

**भट–भटीण**–भटाची बायको.

**तेली–तेलीण**–तेल्याची बायको; परंतु,

**कुणबी–कुणबीण**–म्हणजे कुणब्याची बायको नव्हे; तर कुणबीण म्हणजे बटकी.

**कसबी–कसबीण**–म्हणजे कसबी पुरुषाची बायको किंवा कुशल स्त्री नव्हे; तर कसबीण म्हणजे वेश्या.

**मासा, ढेंकूण, कोळी, डांस** इत्यादिकांस सर्वांस पुल्लिंगी मानितात: त्यांत माद्या नसतील काय?

**ऊ, मुंगी, माशी** इत्यादिकांस स्त्रीलिंगी मानितात; ह्यांत नर नसतील काय?

**चिलट, मुरकूट,** इत्यादिकांस सर्वांस नपुंसकलिंगी धरितात; त्यांत नर आणि माद्या नसतील काय?

प्राण्यांमध्यें नर आणि माद्या ह्या असल्याच पाहिजेत. परंतु त्यांच्या जातींविषयीं अज्ञान असल्यामुळें असे परिपाठ पडले आहेत.

**कुटुंब** शब्द नपुंसकलिंगी आहे; ह्याचा अर्थ स्त्री असा होतो. हीच गोष्ट संस्कृतांतल्या **कलत्र** शब्दास लागू आहे.

त्याचप्रमाणेंच–

अंब्याचें झाड–तो आंबा.

नारळाचें झाड–तो माड.

चिंचेचें झाड–ती चिंच.

सीताफळीचें झाड–ती सीताफळ.

असा एक चमत्कारिक प्रकार आहे.

आणखी,

**ग्रंथ**—पुल्लिंगी; त्याला पोथी म्हटलें कीं ती स्त्रीलिंगी आणि पुस्तक म्हटलें कीं नपुंसकलिंगी.

---

## (४)

## वचनें.

५. अकारान्त पुल्लिंगी, इकारान्त पुल्लिंगी, उकारान्त पुल्लिंगी, आणि आकारान्त स्त्रीलिंगी, ह्या नामांचीं एकवचनें आणि अनेकवचनें एकसारखींच होतात. उ० **एक खांब, दोन खांब; एक तेली, दोन तेली; एक लाडू, दोन लाडू; एक कला, दोन कला;** इ०. अशा शब्दांचीं वचनें, वाक्यांतल्या मागच्या पुढच्या संबंधावरून कळतात. तीं नीट समजून मग व्याकरण करावें.

**दहीं, दूध, गूळ, साखर, पाणी, सोनें, रुपें;** इ० पदार्थवाचक नामांचें अनेकवचन मुळींच होत नाहीं; तसेंच **शाहाणपण, गुरुत्व** इत्यादि भाववाचकनामांचें अनेकवचन होत नाहीं.

**बुआ, दादा** ह्यांचीं अनेकवचनें काय?

अनेकवचन हें अनेकत्व दाखविण्यास घालितात; परंतु, अतिशयित्व दाखवावयाचें असतां एकवचनाचा उपयोग करितात.

उ०. यात्रेस **लाख माणूस** आलें होतें; पहिल्या पंक्तीस **पांचशें पान** बसलें होतें.

---

## (५)

६. **विभक्तीचे अर्थ.**—नामाचा किंवा सर्वनामाचा संबंध इतर कोणत्या शब्दाशीं काय आहे हें सांगणें, ह्मणजे त्याच्या विभक्तीचा अर्थ सांगणें होय. ते अर्थ अनेक आहेत; परंतु, साधारण निर्वाहाला पंधरा बस होतात. ते हे:—कर्ता, कर्म, उद्देश, परिमाण, करण, हेतु, अंगविकार, साहित्य, सन्निधान, गुण, संप्रदान, अधिकरण, अपादान, संबंध आणि विधान. ह्यांचे अर्थ नीट लक्षांत आणून ज्या ठिकाणीं जो लागत असेल तो सांगावा. उगाच कांहींतरी सांगूं नये.

१. **कर्ता**.–म्हणजे क्रिया करणारा; ज्याचे हातून क्रिया होते तो.–**मुलगा** काम करितो, ह्यांत मुलगा **कर्ता**.

२. **कर्म**.–ह्मणजे कर्ता वेगळा आणि जें काय तो करितो तें वेगळें; अथवा, क्रियापदाचा अर्थ पूर्ण होण्यास कर्त्याशिवाय जें आवश्यक लागतें तें.–मुलगा **काम** करितो, ह्यांत काम हें **कर्म**. **मुलगा करितो**, तेवढ्याला कांहीं पूर्ण अर्थ नाहीं.

३. **उद्देश**.–प्रथमा विभक्तीच्या अनेक नामांबद्दल पुढें सर्वनाम घातलेलें असतें, त्या नामांच्या प्रथमेचा अर्थ उद्देश. **राम** आणि **कृष्ण** ह्यांस बोलाव, ह्यांत राम आणि कृष्ण, ह्या प्रथमांचा अर्थ **उद्देश**, ह्यांस ह्या सर्वनामाकडे.

४. **परिमाण**.–म्हणजे माप.–मग तें कशाचेंही असो. दोन **मण** धान्य; चार **कोस** चाल; ह्यांत मण आणि कोस ह्या **परिमाणार्थी** प्रथमा होत.

५. **करण**.–म्हणजे क्रिया करण्याचें साधन.–**चाकूनें** लेखणी कर, ह्यांत चाकूनें ह्या तृतीयेचा अर्थ **करण**.

६. **हेतु**.–म्हणजे कारण.–तो गांव **दुष्काळानें** ओस पडला, ह्यांत दुष्काळानें, ह्या तृतीयेचा अर्थ **हेतु**, किंवा कारण.

७. **अंगविकार**.–म्हणजे अंगसंबंधी गुणदोष.–**पायानें** लंगडा, **डोळ्यानें** आंधळा; ह्यांत पायानें आणि डोळ्यानें ह्या तृतीयेचा अर्थ **अंगविकार**.

८. **साहित्य**.–म्हणजे बरोबर असणें.–एका **वस्त्रानें** बाहेर पडला,–ह्यांत वस्त्रानें ह्या तृतीयेचा अर्थ **साहित्य**.

९. **सन्निधान**.–म्हणजे जवळ असणें.–**मजशीं** बोलूं नको, ह्यांत, मजशीं ह्या तृतीयेचा अर्थ **सन्निधान**. **शीं** प्रत्यय लागला ह्मणजे अर्थ सन्निध होतो.

१०. **गुण**.–म्हणजे धर्म, विशेष गोष्ट.–**मनानें** मोकळा, ह्यांत मनानें ही **गुणार्थी** तृतीया.

११. **संप्रदान**.–म्हणजे प्रत, साठीं, करितां असा अर्थ.–**घोड्याला** दाणा, ह्यांत घोड्याला ह्या चतु० अर्थ.–**संप्रदान**.

१२. **अधिकरण.**–ह्मणजे क्रिया घडण्याचें स्थान, ठिकाण. **पुण्यास** गेला, ह्यांत पुण्यास ह्या चतु० अर्थ **अधिकरण.**

१३. **अपादान.**–ह्मणजे वियोग, दूर होणें.–**काशीहून** आला, ह्यांत काशीहून ही **अपादानार्थी** पंचमी.

१४. **विधान.**–म्हणजे कथन–सांगणें. तो गृहस्थ **ब्राह्मण** आहे, तो मुलगा **कृष्ण** झाला, ह्यांतल्या ब्राह्मण आणि कृष्ण ह्या प्रथमेचा अर्थ कोणी **विधान** करितात.

१५. **संबंध.**–म्हणजे अन्वय, किंवा नातें.–**हाताचें** बोट, **सोन्याची** आंगठी, ह्यांत **हाताचें, सोन्याची,** ह्यांचा अर्थ **संबंध.**

ही षष्ठी विभक्ति आहे. कितीएक व्याकरणकार ही विभक्ति न मानितां, तीं सगळीं विशेषणें समजतात. म्हणजे, सोन्याची हें विशेषण आंगठीचें असें करितात.

वस्तूंचे जितके संबंध परस्परांशीं आहेत, तितके विभक्तीचे अर्थ वेगळे वेगळे होण्यासारखे आहेत. ह्यांत अमक्या विभक्तीचा अर्थ अमुकच असावयाचा, आणि अमुक असावयाचा नाहीं, असा आग्रह धरणें नीट नाहीं. जेणेंकरून वाक्याचा अर्थ लवकर लक्षांत येण्यास साह्य होईल तो अर्थ खरा; असें धरून चालावें.

**रामानें कृष्णास मारिलें.**—ह्या वाक्यांत **कृष्णास** हें कर्म आहे, म्हणून ती द्वितीया होय, हें उघड आहे. परंतु, कृष्णास ह्या शब्दापुढें **लांकूड** हा शब्द घातला, ह्मणजे लागलीच कृष्णास ही चतुर्थी होऊन, तिचा अर्थ संप्रदान, आणि **लांकूड** हें मारिलें ह्याचें कर्म होतें. आणि **भावी** प्रयोगाचा लागलाच **कर्मणि** प्रयोग होतो. वास्तविक पाहिलें असतां, रामानें कृष्णास लांकडानें मारिलें, अशासारखा याचा अर्थ आहे.

---

## (६)
## सर्वनाम.

७. हें नामाच्या बदली काम करणारें आहे. ह्मणून, त्याला नामाचे सगळे संस्कार होतात; म्हणजे, त्यास लिंग, वचन, आणि विभक्ति हीं लागतात. **मी, तूं, आपण, कोण, कोणी, कांहीं कसें** इत्यादिकांस सगळ्या विभक्ति लावणें हें अंमळ अवघड आहे. तें व्याकरणावरून तयार करून ठेवावें. सर्वनामांला संबोधन लागत नाहीं.

**कोणी** असें ह्मणतात.–ह्यांत कोणी ही **प्रथमा.**

हें काम **कोणीं** केलें.–ह्यांत कोणीं ही **तृतीया.**

**मी** जातों.–ह्यांत मी ही **प्रथमा.**

**मीं** केलें.–ह्यांत मीं ही **तृतीया.**

**आह्मी** जातों; ह्यांत आम्ही ही **प्रथमा.**

**आह्मीं** केलें; ह्यांत आह्मीं ही **तृतीया.**

ह्याप्रमाणें **तुह्मी** आणि **तुह्मीं** ह्यांचें समजावें. प्रथमा आणि तृतीया ह्यांचीं रूपें लिहितेवेळीं अनुस्वाराचा भेद ठेवतात, तो लक्षांत आणावा.

**आपण** हें सर्वनाम तिन्ही पुरुषीं असतें.

**आपण** निघालों.–ह्यांत आपण= **आह्मी.** (प्र० पु०).

**आपण** उद्यां या.–ह्यांत आपण=**तुह्मी.** (द्वि० पु०).

**आपण** घरांत बसतो.–ह्यांत आपण=**तो.** (तृ० पु).

नामांच्या मागें **तो जो** इत्यादि जे शब्द येतात, त्यांस सर्वनामें म्हणण्याचें कारण नाहीं. कां कीं, तीं नामाच्या बदल घातलेलीं नसून त्यांच्या योगानें त्या नामांचा गुण मात्र कळतो; म्हणून त्यांस एकदम विशेषण म्हणावें हें बरें.

**मला** मुलाला हें कशाला पाहिजे? **तुह्मीं** साधूंनीं असें कां करावें ? तूं **काय** जिन्नस आणिलास ? तुला **कोणता** आंबा पाहिजे ? ह्यांत **मला, तुह्मीं, काय,** आणि **कोणता** हीं सर्वनामें दिसतात, तरी तीं विशेषणें होत.

---

(७)

## विशेषण.

८. वस्तूच्या गुणांचें वर्णन करणें हें विशेषणाचें काम होय. तें ां एका शब्दानें होतें, कधीं अनेक शब्दांनीं होतें.

**वंद्य** पुरुष = वंदन करण्यास योग्य आहे असा पुरुष.

**अभ्यासी** मुलगा = मनापासून विद्याभ्यास करितो असा मुलगा.

**तूं मागितलेंस तें** पुस्तक. ह्यांत, **तूं मागितलेंस तें** एवढें ।शेषण आहे, पुस्तकाचें.

**तांबडी टोपी घातलेला** मुलगा. ह्यांत, **तांबडी टोपी ।तलेला** हें, मुलगा ह्याचें विशेषण आहे.

तरी, जेथें असे अनेक शब्द घातलेले असतात, तेथें त्यांचें व्या-रण वेगळें वेगळें करावें, हें चांगलें.

विशेषणाचा उपयोग नामाप्रमाणें करितात, तेव्हां तें नाम समजावें.

**भल्याच्या** संगानें; ह्यांत भला हें **नाम.**

**गुणवंताच्या** जवळ याचना;–ह्यांत गुणवंत हें **नाम.**

विशेषण हें बहुधा विशेष्याच्या मागें असतें. परंतु, विशेष्याविषयीं जें काय सांगावयाचें असतें, तेंच विशेषण असतें, तेव्हां तें त्याच्यापुढें येतें. तेव्हां त्याला **विधेय विशेषण** म्हणावें. तो मुलगा चांगला आहे. ह्यांत **चांगला** हें मुलाचें **विधेय विशेषण** होय.

नामाचें षष्ठी विभक्तीचें रूप हें प्रायः विशेषण असतें.

**लांकडाची पेटी**=लांकडी पेटी.

**लोखंडाचा पत्रा**=लोखंडी पत्रा.

**नदीचें पाणी**=नदींतलें पाणी.

असें सगळ्या रूपांचें होत नाहीं. **तांदुळांचा भात, पक्ष्यांचें घरटें, बापाचा मुलगा,** इत्यादिकांत तें कसें व्हावें? व्हावयाचें

नाहीं; म्हणून त्यांस विशेषणें म्हणूं नयेत; जेथें असें होण्यासारखें असेल, तेथेंच तें म्हणावें.

---

## (८)

## क्रियापद.

९. कितीएक क्रियापदें सकर्मक असतात; आणि अकर्मकही असतात. त्यांस **उभयविध** क्रियापदें म्हणतात.

वाऱ्यानें दार **उघडलें.**–ह्यांत उघडलें हें **अकर्मक.**

मीं दार **उघडलें.**–ह्यांत उघडलें हें **सकर्मक.**

लोकांचे थवे **लोटले.**–ह्यांत लोटले हें **अकर्मक.**

त्यानें दगड **लोटले.**–ह्यांत लोटले हें **सकर्मक.**

हा भेद दाखविण्याकरितां कोणी सकर्मकांचीं रूपें **उघडिलें, लोटिले,** अशीं करितात.

कर धातु नेहमीं सकर्मक असतो. परंतु "आज फार गरमी **करते,**" येथें कर धातु **अकर्मक.** कां कीं, करते = होते.

राम **गोसावी** झाला.–ह्यांस, कोण आणि काय लाविल्यानें **गोसावी** हें कर्म वाटतें. परंतु तें कर्म नव्हे, विधिविशेषण आहे; किंवा विधानार्थी प्रथमा आहे, असेंही ह्मणतात.

तो **वारला.**–वारला, हें क्रियापद नेहमीं भूतकाळीं येतें. इतर काळीं कधींही येत नाहीं.

तो **आला** तर मी येईन.–ह्यांत आला हें रूप **भूतकाळीं** दिसतें खरें; परंतु, अर्थानें तो **भविष्यकाळ** आहे; तो येईल तर मी येईन, असा अर्थ.

तुम्ही पुढें चला मी **आलोंच;** ह्यांत आलोंच हा दिसण्यांत **भूतकाळ** आहे; तरी अर्थानें **भविष्यकाळ** आहे; ह्यांत खचीतपणा विशेष दाखविला आहे, एवढेंच.

काळसंबंधानें क्रियापदांचीं रूपें घोकून पाठ करण्याचें प्रयोजन नाहीं. काळाचें नांव क्रियापदाच्या स्वरूपावरून बहुधा कळण्यासारखें असतें. **केलें होतें,** हा भूतभूतकाळ म्हणतात; कां कीं केलें हा

भूतकाळ आहे, आणि होतें हाही भूतकाळ आहे. **करीत होतों,** ह्यास **अपूर्णभूत** म्हणतात; कां कीं, करण्याची क्रिया पूर्ण झाली नव्हती. **करणार आहें,** हा वर्तमानभविष्य म्हणतात; कां कीं, करणार हा भविष्य काळ, आणि आहें हा वर्तमान काळ आहे. असा मिश्रकाळ आला म्हणजे, रूपें मागेंपुढें कशींही असलीं तरी, मुख्य काळाचें नांव शेवटीं सांगावें, म्हणजे असें. मीं **केलें असेल;** ह्यांत **केलें** हें भूतकाळचें रूप आधीं येऊन, **असेल** हें भविष्यकाळचें रूप मग आलें आहे; तरी, तो क्रम मनांत न आणितां, ह्यास भविष्यभूतकाळ म्हणावयाचें; कारण, हा भूतकाळाचा भेद आहे; म्हणजे, ही क्रिया भूतकाळीं झालेली सांगावयाची आहे. म्हणजे, ज्या काळाचा तो पोटभेद असेल, त्या काळाचें नांव शेवटीं यावें.

१०. कितीएक क्रियापदांतला मूळधातु काढण्याविषयीं विचार पडतो. **मला भात करितां येतो, त्याला वाचतां येतें,** इत्यादि वाक्यांतल्या क्रियापदांत, कोणी कोणी, ये एवढाच धातु धरितात. तो कां? ये एवढ्याला कांहीं स्वतंत्र अर्थ नाहीं; **करितां येणें** ह्याला अर्थ आहे; म्हणून करितां येणें, हेंच मूळ धातूचें रूप कां धरूं नये? धरावें.

११. त्याप्रमाणेंच ह्या वाक्यांत **मला** हा कर्ता आहे, आणि **त्याला** हाही कर्ता आहे; त्याप्रमाणें व्याकरण करावें; आणि ते कर्मणिप्रयोग करावे. कां कीं, त्यांत कर्माचें लिंगवचन क्रियापदांस लागलें आहे. कर्म बदललें कीं लागलेंच क्रियापद बदलावें लागतें. मग वर्तमानकाळ असूनही कर्मणिप्रयोग कां होईना; भूतकाळच काय करावयाचा आहे? कर्माच्या अनुरोधानें क्रियापद फिरतें आहे, एवढें बस आहे.

१२. धातुसाधित अव्ययें-**ऊन** प्रत्यय लागून होतात, त्यांचे अंतर्गत काल, अर्थानें पुढच्या पूर्ण क्रियापदाच्या कालावर अवलंबून असतात. पहा.

तो जेऊन आला. = तो जेवला आणि आला. (भू० का०)
तो जेऊन येतो. = तो जेवतो आणि येतो. (व० का०).

तो जेऊन येईल.=तो जेवील आणि येईल. (भ०का०).

म्हणून ऊनप्रत्ययान्त अव्ययांस पूर्वकालवाचक किंवा भूतकालवाचक म्हणूं नये; तर पुढच्या क्रियापदाचा जो काळ असेल, तद्वाचक म्हणावें.

**तो जेऊन गेला नाहीं.** ह्या वाक्याचे अर्थ दोन होतील. म्हणजे, तो जेवला पण गेला नाहीं, हा एक; आणि तो न जेवतां गेला, हा दुसरा. त्यांतल्या पहिल्या अर्थाच्या वेळीं जेऊन ह्याच्या पुढें किंचित् थांबावयाचें असतें; आणि दुसऱ्या अर्थाच्या वेळीं तो ह्याच्यापुढें किंचित् थांबावयाचें असतें. ह्मणजे पहा, **नाहीं** हें गेला ह्याच्या पुढें आहे. तरी दुसऱ्या अर्थाच्या वेळीं त्याचा संबंध जेऊन ह्याजकडे लागतो.

१३. **केल्यास, गेल्यास**, इ० रूपें जीं आहेत, तीं धातुसाधित अव्ययें आहेत. त्यांचें व्याकरण, कोणीं, केला यास, आणि गेला यास, अशीं वेगळीं पदें पाडून करितात; तें बरें. तें अर्थ स्पष्ट होण्यास उपयोगीं पडतें. त्याप्रमाणेंच जावयास, करावयास इ० रूपांचें करावें. त्यांत कांहीं शब्द अध्याहृत धरावे लागले, तरी चिंता नाहीं. अर्थ स्पष्ट झाला ह्मणजे झालें.

---

## (९)

## अव्यय.

१४. शब्दयोगी, क्रियाविशेषण, उभयान्वयी, आणि केवळप्रयोगी अशीं चार प्रकारचीं अव्ययें आहेत. त्यांत, क्रियाविशेषण अव्यय विशेष विचार करण्यासारखें आहे. त्याच्या योगानें वाक्याच्या अर्थास भर पडते. म्हणजे, क्रिया कोठें, कधीं, कशाप्रकारें आणि कितीदां झाली हें समजतें. पहा.

ती नाचते.

ती **तेथें** नाचते. (स्थलवा०)

ती तेथें **तेव्हां** नाचते. (कालवा०)
ती तेथें तेव्हां **थयथयां** नाचते. (अनुकरणवा०)
ती तेथें तेव्हां थयथयां **दहादां** नाचते. (आवृत्तिवा०)

ह्या प्रकारें करून अव्ययें घालून किंवा अव्ययांच्या ऐवजीं वाक्यभाग घालून वाक्यामधल्या अर्थास भर घालितां येते. **तेथें**च्या जागीं **त्या ठिकाणीं**, **तेव्हां**च्या जागीं **त्या वेळीं**, असें घालतां येईल.

## (१०)

## अर्थविचार.

१५. वाक्यांत मुख्य अर्थ थोडा असतो. परंतु, त्या अर्थाच्या पोषणार्थ किंवा विस्तारार्थ त्यांत अनेक शब्द घातलेले असतात, आणि तेणेंकरून निकट संबंधाचे शब्द दूर दूर पडतात आणि वाक्य मोठें होतें. ते शब्द वेगळे काढणें, आणि शब्दांचा निकट संबंध दाखवून, वाक्याचा अर्थ लवकर लक्षांत येईल असें करणें, हा व्याकरण शिकण्याचा मुख्य उपयोग होय.

"[१] तुमचें पत्र पोंचल्यानंतर चार दिवसांनीं, मी, [२] ती रकम आणण्याकरितां, [३] तुमच्या मित्राबरोबर, [४] हुंडी बरोबर घेऊन, [५] ती खचीत पटेल अशा खातरीनें, [६] त्या सावकाराकडे गेलों." ह्या वाक्यांत, "मी गेलों," हें मुख्य वाक्य. ह्मणजे पद्य. ह्यांतल्या पहिल्या भागानें क्रियेचा काल दाखविला; दुसऱ्यानें क्रियेचा हेतु दाखविला; तिसरा व चवथा ह्यांनीं बरोबरचें साहित्य दर्शविलें; पांचव्यानें समज दर्शविला, तें मनांतलें साहित्यच आहे; आणि सहाव्यानें क्रियेचें स्थल दर्शविलें. अशा प्रकारें मुख्य वाक्यांतल्या अर्थाच्या पोषणाकरितां किंवा विस्ताराकरितां कोणकोणते भाग घातले असतात, हें चांगलें समजण्यास व्याकरण फार उपयोगीं पडतें.

कवितांचा अर्थ लावण्यास व्याकरण फार उपयोगीं पडतें, असें

सांगून, कैलासवासी दादोबा पांडुरंग ह्यांनीं आपल्या मोठ्या व्याकरणाच्या शेवटीं अर्थाकरितां एक आर्या दिली आहे. ती मोरोपंती आहे. तिच्या दोन्ही अर्धांतलीं अक्षरें एकसारखीं आहेत. परंतु, त्यांचीं पदें वेगळीं पडून अर्थ वेगळा होतो. धर्मराजा अरण्यवासांत असतां, त्यास श्रीकृष्ण जें बोलला, त्याचें कथन तींत आहे. ती अशी.

## आर्या.

अनलसमीहितसाधीरायावारामहीवराकामा
अनलसमीहितसाधीरायावारामहीवराकामा. १

### पहिल्या अर्धाचीं पदें.

| पद. | | अर्थ. |
|---|---|---|
| अनलसमीहित. | = | अग्नीनें इच्छिलेलें. |
| साधी... ... | = | साधितो. |
| राया... ... | = | राजा. |
| वारा... ... | = | वायु. |
| महीवरा. ... | = | पृथ्वीपते. |
| कामा... ... | = | कार्यास. |

### दुसऱ्या अर्धाचीं पदें.

| पद. | | अर्थ. |
|---|---|---|
| अनलस... ... | = | आळसरहित. |
| मीहि... ... | = | मीदेखील. |
| तसा... ... | = | त्याप्रमाणें. |
| धीरा... ... | = | धैर्यवंता. |
| यावा... ... | = | यावा. |
| रामही... ... | = | रामसुद्धां. |
| वरा... ... | = | श्रेष्ठ. |
| का... ... | = | काय. |
| मा... ... | = | लक्ष्मी. |

कृष्ण म्हणतो, हे धैर्यवंता पृथ्वीपते राजा, अर्मानें इच्छिलेलें कार्य
मा) वारा साधितो, तसा मी देखील आळसरहित (होत्साता) तुझें
र्य साधायास तयार आहें. (ह्यास) रामही (म्हणजे माझा वडील
ऊ बळरामही) यावा; (मग) लक्ष्मी (च) का (मोठी) श्रेष्ठ? (तिनें
ां येऊं नये). कंसांतले शब्द पदरचे घालावे लागतात.

तात्पर्य एवढेंच आहे कीं, कृष्ण धर्मास म्हणतो, मी तुझें कार्य क-
यास सिद्ध आहें. आणि ह्याशिवाय जो पाल्हाळ आहे, तो केवळ
र्थपोषणार्थ आहे; आणि त्यांतही दोन्ही अर्थांचीं सगळीं अक्षरें एक-
ारखीं साधण्याकरितां पुष्कळ ओढताण करावी लागली आहे; हें
ोडा विचार केल्यावर सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

---

## साहित्य.

चौदा विद्या, चौसष्ठ कला, साडेतीन वस्त्रें, साडेतीन शहाणे, इ-
त्यादि गोष्टी बोलण्यांत येतात, पण त्या कोणत्या हें फारसें माहीत
नसतें. तें कळावें, किंवा निदान संग्रहीं तरी असावें, ह्मणून त्यांचा
समावेश येथें केला आहे. आणि त्यास **साहित्य** असें नांव दिलें
आहे. कां कीं, त्याच्या योगानें अर्थ स्पष्ट होण्यास पुष्कळ साह्य होतें.

**अठरा कारखाने.** उष्टर–खबुतर–जनान–जवाहीर–जामदार–
जिकीर–तालीम–तोफ–थट्टी–दप्तर–दारू–दिवान–नगार–पील–फराम-
बर्दी–मोदी–शिकार. २. तोप–पील–उष्टर–फराम–शिकार–रथ–जा-
मदार–जवाहीर–जिराईत–नगार–दारू–वैद्य–लकड–इमारती–मुदबख–
कुणबिणी–खाजगत–थट्टी. ३. खजीना–दप्तर–जामदार–पील–जिरा-
ईत–अंबर–फरास–मुदबख–नगार–सरबत–आबदार–शिकार–तालीम–
दारू–उष्टर–बकरे–तोफ–सराफ.

**अठरा धान्यें.** गहूं, साळ, तूर, जव, जोंधळा, वाटाणा, लांक,
चणा, जवस, मसूर, मूग, राळा, तीळ, हरीक, कुळीथ, सावा, उ-
डीद, चवळी.

**अष्टगंध.** चंदन, अगरु-हीबेर, देवदार, कोष्टकोलिंजन, कुसुम, शैलज, जटामांसी, मुरगोरोचन.

**अष्टदिक्पाल.** इंद्र, वन्हि, यम, नैऋत, वरुण, मारुत, कुबेर, ईश.

**अष्टदिशा.** पूर्व, आग्नेय, दक्षिण, नैर्ऋति, पश्चिम, वायव्य, उत्तर, ईशान्य.

**अष्टधातु.** सोनें, रुपें, तांबें, कथील, शिसें, पितळ, लोखंड, तिखें.

**अष्टनायका.** (कृष्णाच्या) रुक्मी, जांबवती, भामा, सत्या, भद्रा, लक्ष्मणा, कालिंदी, मित्रविंदा.

**अष्टप्रधान.** प्रधान, अमात्य, सचीव, मंत्री, प्रतिनिधि, राजाज्ञा, वैद्य, उपाध्याय. **२ श्लोक.** प्रधान अमात्य सचीव मंत्री ॥ दबीर न्यायाधीश न्यायशास्त्री ॥ सेनापती त्यांत असे सुजाणा ॥ अष्ट प्रधानीं नृप मुख्य जाणा ॥

**अष्टाधिकार.** जलाधिकार, स्थलाधिकार, ग्रामाधिकार, कुललेखन, ब्रह्मासन, दंडविधिनियोग, पौरोहित्य, ज्योतिष.

**अष्टाक्षरी मंत्र.** काय करूं कर्म करूं.

**चौदा भुवनें.** **सप्तलोक** आणि **सप्तपाताळ** पहा.

**चौदा रत्नें.** लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक, सुरा, धन्वंतरी, चंद्र, कामधेनु, ऐरावत, अप्सरा, सप्तमुखीअश्व, विष, हरिधनु, शंख, अमृत.

**चौदा विद्या.** चतुर्वेद, षडंगें, अठरा पुराणें, मीमांसा (पूर्व आणि उत्तर), न्याय (गौतमन्याय आणि कणादन्याय) धर्मशास्त्र.

**चौसष्ट कला.** गीत, वाद्य, नृत्य, नाट्य, आलेख्य, विशेषकच्छेद्य, तंदुलकुसुमबलिप्रकार, पुष्पास्तरण, दशनवसनांगराग, मणिभूमिकाकर्म, शयनरचन, उदकवाद्य, नेपथ्ययोग, उदकघात, चित्रयोग, माल्यग्रथनविकल्प, कर्णपत्रभंग, पानकरसरागासवयोजन, सूचीवानकर्म, सूत्रक्रीडा, सुगंधयुक्ति, वीणाडमरुकवाद्यानि, प्रहेलिकाकूटवाणीज्ञान, प्रतिमाला, दुर्वचकयोग, पुस्तकवाचन, नाटकाख्या-

र्शन, काव्यसमस्यापूरण, पट्टिकावेत्रबाणविकल्प, पुष्पवटिका-
ज्ञान, यंत्रमातृकाधारणमातृकासंवाच्यं, मानसीकाव्यक्रिया,
योग, तर्ककर्म, तक्षण, वास्तु, रौप्यरत्नपरीक्षा, धातुवाद,
गज्ञान, बालक्रीडन, आकरज्ञान, वृक्षायुर्वेदयोग, मेषकुक्कुट-
युद्धविधि, शुकसारिकाप्रलापन, उत्साहन, केशमार्जनकौशल,
यानकोश, शेखरापीडयोजन, गंधयुक्ति, भूषणयोजन, ऐंद्रजाल,
मारणयोग, हस्तलाघव, चित्रशाकापूपभक्तविकारक्रिया, अक्षर-
काकथन, देशभाषाज्ञान, छंदोज्ञान, क्रियाविकल्प, वस्त्रगोपन,
विशेष, आकर्षकक्रीडा, म्लेच्छितकविकल्प, वैनायिकविद्याज्ञान,
यिकविद्याज्ञान, वैतालिकविद्याज्ञान.

**तीन ताळ.** ( सृष्टीचे ) स्वर्ग, पृथ्वी, पाताल.

**त्रिगण.** देव, मनुष्य, राक्षस.

**त्रिगुण.** सत्व, रज, तम.

**त्रिदोष.** कफ. वात, पित्त.

**त्रिमूर्ति.** ब्रह्मा, विष्णु, शिव ( यांची ).

**त्रिलोक.** स्वर्ग, मृत्यु, पाताल.

**त्रिविध.** ( पाप ) कायिक, वाचिक, मानसिक.

**त्रिविध परीक्षा.** ( रोग्याची ) दर्शन, स्पर्शन, प्रश्न.

**दशग्रंथ.** संहिता, ब्राह्मण, अरण, शिक्षा, कल्प, व्याकरण, नैघंट, निरुक्त, छंद, ज्योतिष.

**नव खंडे.** ( जंबुद्वीपाचीं ) इलावृत, भद्राश्व, हरिवर्ष, किंपुरुष, केतुमाल, रम्यक, भरत, हिरण्य, उत्तरकुरु. २. भरत, वर्त, राम, रामाळा, केतुमाल, हिरे, विधिवस, महि, सुवर्ण. ( विवेकसिंधुग्रंथ. )

**नव ग्रह.** सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र शनि, राहु, केतु.

**नव नाग.** अनंत, वासुकी, शेष, पद्मनाभ, कंबल, शंखपाल, धृतराष्ट्र, तक्षक, कालीय.

**नव रत्नें.** हिरा, माणीक, मोतीं, गोमेद, इंद्रनील, पाच, प्रवाल, पुष्कराज, वैडूर्य अ०तोमळी.

**नव रस.** शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत, शांत.

**नवविधा भक्ति.** श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, आत्मनिवेदन.

**पंचगव्य.** ( गाईचें ) दूध, दहीं, तूप, मूत व शेण.

**पंचग्रंथ.** ( यजुर्वेदाचे ) संहिता, ब्राह्मण, अरण, पदें, क्रम.

**पंचमहाभूतें.** पृथ्वी, उदक, वायु, तेज, आकाश. २ (सूक्ष्मरूप) गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द.

**पंचवकार.** विद्या, वपु, वाचा, वस्त्र, विभव. **श्लोक.** विद्यया वपुषा वाचा वस्त्रेण विभवेन वा ।। वकारैः पंचभिर्हीनोनरो नाप्नोति गौरवम् ।।

**षट्कर्मे.** (ब्राह्मणाचीं) अध्ययन, दान, याजन, अध्यापन, प्रतिग्रह, यजन. २. जारण, मारण, उच्चाटण, मोहन, स्तंभन, विध्वंसन. ३. कणवृत्ति, प्रतिग्रह, याचना, कृषि, वाणिज्यवृत्ति, गोरक्ष्य (ह्मणजे, दाणे टिपणें, दान घेणें, भिक्षा मागणें, शेत करणें, व्यापार करणें, गाई राखणें, हीं कामें ब्राह्मणानें उपजीविकेकरितां करावीं. )

**षट्शास्त्रें.** न्याय, वैशेषिक, मीमांसा, वेदांत, सांख्य, पातंजल.

**षडंगें.** दोन बाहू, दोन पाय, मस्तक, कटि. २. व्याकरण, छंद, ज्योतिष, निरुक्त, कल्पसूत्र, शिक्षा (हीं वेदाचीं अंगें होत. )

**षड्रस.** गोड, अंबट, खारट, तिखट, तुरट, कडू.

**षड्रिपु.** काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर.

**सप्तपाताल.** अतल, वितल, सुतल, महातल, रसातल, तलातल, पाताल.

**सप्तलोक.** भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक, सत्यलोक.

**सप्तसमुद्र.** क्षारोद, इक्षुरसोद, सुरोद, घृतोद, दधिमंडोद, शुद्धोद, क्षीरोद.

**सप्तस्वर.** सा, रि, ग, म, प, ध, नि–षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत, निषाद.

**साडेतीन पोशाख.** पागोटें, शालजोडी किं० शेला, (पायजामा अ० झगा करायास) महामुदी, (अर्धातुकडा किनखापाचा) पटका.

**साडेतीन मुहूर्त.** दसरा, दिवाळीची प्रतिपदा, वर्षप्रतिपदा, नागपंचमी.

**साडेतीन शहाणे.** सखाराम बापु, विठ्ठल सुंदर, विठ्ठल देवजी, (अर्धाशा०) नानाफडनवीस. (सख्या, विठ्या, देव्या.)

---

आणखीही एक प्रकारचें साहित्य मराठी चांगलें कळण्यास लागतें. त्याचा मासला मात्र येथें दाखवितों. ह्या प्रकारच्या साहित्याचा संबंध लोकांच्या धर्माशीं, दंतकथांशीं, पुराणांशीं, आणि रीतिभातींशीं आहे, हें सहज लक्षांत येईल.

**एकादशीच्या घरीं शिवरात्र** = दरिद्रानें दरिद्रापाशीं मागणें.

**कर्णाचा अवतार** = मोठा उदार.

**काशीपासून रामेश्वरपर्यंत** = देशभर.

**कुंभकर्णी निद्रा** = फार झोंप.

**केवळ बृहस्पति** = उत्तम वक्ता.

**गोकुळांतला कृष्ण** = व्यभिचारी.

**जानवें तोडणें** = संतापणें.

**जानवें मोकळें करून घेणें** = एकाद्याच्या सुतकांतून मोकळें होणें.

**नाक धरून बसणें** = देवदेव करणें.

**यादवी माजणें** = अपसांत कलह लागणें.

**राम ह्मणणें** = प्राण सोडणें.

**सोनारानें कान टोंचला ह्मणजे तो बरा** = ज्याचें काम त्यानें केलें ह्मणजे मग कोणाला वाईट वाटत नाहीं.

**क्षेत्रीं गेल्यावांचून मुंडण होत नाहीं** = ज्या कामाला जी जागा योग्य तें काम त्या जागीं केल्याशिवाय चांगलें होत नाहीं.

## आर्या.

त्यागावीच कुसंगति सर्वार्थद काय पाळणारांनीं
स्वर्गपरें पुत्राचा बांधावा काय पाळणा रानीं.

मोरोपंत.

ह्या आर्येंत, स्वर्गप्राप्ति करून घेणें आणि पुत्राचा पाळणा रानांत बांधणें, ह्यांचा जो संबंध जोडिला आहे, तो बरोबर समजण्यास हें चांगलें कळायास पाहिजे कीं, पुत्राच्या हातून पिंडप्रदान झाल्यावांचून पित्यास स्वर्गप्राप्ति होत नाहीं, असें समजतात. त्याप्रमाणेंच,

## आर्या.

सुजनासि बिभीषणता रुचते कुजनासि तुज दृशाननता
अनता जना शिवे रे संसारीं ओखटी दृशा न नता.

मोरोपंत.

ह्या आर्येंतील बिभीषणता आणि दशाननता पूर्णपणें कळण्यास रामायणकथा ठाऊक असणें अवश्यक आहे. आणखी,

## आर्या.

विष्णुपदीं पिंड तसा शत्रुशिरीं पाय देय जो डावा
तो म्यां दिला अधिक याहुनि जन्मुनि अर्थ काय जोडावा.

मोरोपंत.

ह्या आर्येंत गयेमध्यें विष्णुपदीं पिंड देणें ह्याचा संतोष, आणि शत्रूच्या मस्तकावर पाय देणें ह्याचा संतोष, ह्यांचें सादृश्य वर्णिलें आहे. तें, चांगलें लक्षांत येण्यास, विष्णुपदीं पिंड देण्याचें माहात्म्य केवढें आहे, हें कळलें पाहिजे.

सारांश, ज्या लोकांची भाषा शिकावयाची आहे, त्या लोकांच्या धर्मांची, पुराणांची, रीतिभातींची, वस्तूंची आणि इतिहासाची चांगली माहिती असली पाहिजे. एरव्हीं ती चांगली यावयाची नाहीं.